वनविभागाचे संगणकीकरण या योजनेंतर्गत सन २०२२-२३ करिता निधी वितरित करणेबाबत. (२४०६ ८६६९)

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
**शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२२/प्र.क्र.६०/फ-१०**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १५ मार्च, २०२३

वाचा :-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१ / पी / यो / चाबाप्र / प्र.क्र.१८ (८६६९) /८०८/ २०२२-२३, दि.०२.०३.२०२३

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.६०/फ-१०, दि.०८.०९.२०२२

४) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०८.०२.२०२३

**प्रस्तावना :-**

वनविभागाचे संगणकीकरण करणे (२४०६ ८६६९) या योजनेंतर्गत संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयानुसार ५०-इतर खर्च या उद्दिष्टांतर्गत रू.२४३.५६ लक्ष आणि २८-व्यावसायिक सेवा या उद्दिष्टांतर्गत रू.९५.६९ लक्ष असा एकूण रु. ३३९.५५ लक्ष इतका निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात आली होती. आता, प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), यांनी संदर्भाधीन क्र. १ येथील पत्रान्वये २८ - व्यावसायिक खर्च या उद्दिष्टाखाली रू.४४०.२९ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची मागणी केली आहे.

वित्त विभागाने संदर्भीय क्र.३ शासन परिपत्रकान्वये सन २०२२-२३ चे सुधारित अंदाज निश्चित करण्याची कार्यवाही सुरू असून सुधारित अंदाज निश्चित होईपर्यंतच्या कालावधीसाठी विभागास आवश्यक असणाऱ्या खर्चासाठी निधीची गरज लक्षात घेता, २८ - व्यावसायिक खर्च या उद्दिष्टासाठी एकूण वार्षिक तरतूदीच्या ८५ टक्केच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने सदर योजनेंतर्गत २८ - व्यावसायिक खर्च या उद्दिष्टाखाली रू.४४०.२९ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

वनविभागाचे संगणकीकरण करणे या योजनेंतर्गत लेखाशीर्ष २४०६ - वनीकरण व वन्यजीवन, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, राज्य योजनांतर्गत योजना, (१७) वन विभागाचे संगणकीकरण, (१७) (०१) वन विभागाचे संगणकीकरण, संकेतांक-२४०६ ८६६९, २८-व्यावसायिक सेवा या उद्दिष्टांतर्गत रू.४४०.२९ लक्ष इतका निधी खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेवर होणारा खर्च खाली नमूद करण्यात आलेल्या लेखाशीर्षांखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

(आकडे लाखात)

| लेखाशिर्ष | उद्दिष्ट | अर्थसंकल्पित निधी | यापूर्वी वितरीत केलेला निधी | शिल्लक निधी | आता वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| मागणी क्रमांक :- सी-७, २४०६, वनीकरण व वन्यजीवन, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, राज्य योजनांतर्गत योजना, (१७) वन विभागाचे संगणकीकरण, (१७) (०१) वन विभागाचे संगणकीकरण, संकेतांक-२४०६ ८६६९ | २८-व्यावसायिक सेवा | ८३९.३१ | ९५.६९ | ७४३.६२ | ४४०.२९ |
| | ५०- इतर खर्च | १६६०.६९ | २४३.५६ | १४१६.८३ | ०.०० |
| | **एकूण** | **२५००.००** | **३३९.५५** | **२१६०.४५** | **४४०.२९** |

३. <u>उपरोक्त निधी खर्च करताना पुढील अटींची पूर्तता होईल, याची खात्री करण्यात यावी:-</u>

i) प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी मंजूर कामांसाठीच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही याची खात्री करावी तसेच मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर / नवीन क्षेत्रावर / नवीन कामांवर खर्च करता येणार नाही.

ii) सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

iii) सदर योजनेकरीता वितरित केलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

iv) अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी वित्त विभागाच्या दिनांक ०४.०४.२०२२ व दिनांक ०८.०२.२०२३ रोजीचे परिपत्रकात्रातील अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याची खात्री करावी तसेच त्यासोबतच्या परिशिष्टामधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

v) वन विभागाचे संगणकीकरण करणे या योजनांकरीता वेळोवेळी निर्गमित केलेल्या धोरणात्मक शासन निर्णयांमधील अटी व शर्तीची पूर्तता करावी.

vi) वितरीत करून घेतलेला निधी मंडळे / महामंडळे यांच्या वा इतर बँक खात्यात, स्वयप्रपंची लेख्यामध्ये अथवा सार्वजनिक बांधकाम विभागाकडील ठेव अंशदान निधीमध्ये काढून ठेवता येणार नाही.

४. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या दिनांक ०८.०२.२०२३ रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१७१५११५३८७१९ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

GANESH TUKARAM JADHAO

Digitally signed by GANESH TUKARAM JADHAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0078f58512d3ac01315bbbfa4b473ed7729dd2d31644106e2966ab9ee6e92d7d, pseudonym=9511E397949CD516110AD2C5719C064356E8E6EF, serialNumber=6FEEDE606678D569A76B842319BD1C2969AA85BBA5CDCCEE147249F17965E8BB, cn=GANESH TUKARAM JADHAO
Date: 2023.03.17 15:18:04 +05'30'

**(गणेश जाधव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), ½, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
६) सह सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२
७) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२
८) कार्यासन (ब-१), महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
९) निवडनस्ती.